महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय
मंजूरी देण्यात आलेल्या पाणी पुरवठा व मलनि:स्सारण
योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत.
नांदूरा नगर परिषद, जि. बुलढाणा

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१४/प्र.क्र.३१२/पापु.२२
गोकुळदास तेजपाल हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ ऑक्टोबर, २०१८

वाचा :

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.९७/पापु-२२, दि.०४.०३.२०१४
४) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ.(प्र.व्य.य.सं)/तांशा २/३०८, दिनांक २४.०२.२०१४
५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.३१२/पापु-२२, दि.२१.०८.२०१४
६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१४/प्र.क्र.३१२/पापु-२२, दिनांक १४.१०.२०१५
७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१४/प्र.क्र.३१२/पापु-२२, दिनांक ०१.०४.२०१६
८) मुख्याधिकारी, नांदूरा नगरपरिषद यांचे पत्र क्र.६४३/१८,दि.२०.०३.२०१८

प्रस्तावना :

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक ०४.०३.२०१४ अन्वये नांदूरा शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु. २३,१६,२१,६००/- इतक्या ढोबळ किंमतीच्या भांडवली कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र.४ अन्वये नांदूरा शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांच्या एकूण रु. २३,१६,२१,६००/- इतक्या किंमतीस तांत्रीक मान्यता दिली आहे. नांदूरा नगर परिषदेने स्वहिश्श्यापोटी यापुर्वी बँक खात्यामध्ये जमा केलेल्या रु. २३१.६२ लक्ष इतक्या रक्कमेच्या प्रमाणात शासन निर्णय, दिनांक २१.०८.२०१४ अन्वये रु. ४५८.६१ लक्ष, शासन निर्णय, दिनांक १४.१०.२०१५ अन्वये रुपये ८१९.३९ लक्ष तसेच शासन निर्णय, दिनांक ०१.०४.२०१६ अन्वये रु.

५२६.१३ लक्ष इतके अनुदान नांदूरा नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, नांदूरा नगर परिषद यांनी संदर्भ क्र.८ अन्वये मंजूर योजनेंतर्गत एकूण रु. २०८२.७० लक्ष खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र सादर केले असून मंजूर भांडवली कामांचा १०० % पुर्ण झाले असल्याबाबतचा उपांगनिहाय भौतिक प्रगती अहवाल सादर केला आहे. तसेच स्वहिश्श्याची संपुर्ण रक्कम रु.२३१.६२ लक्ष संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली असल्याबाबत कळविलेले असून अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. सदर बाबी विचारात घेता सदर योजनेस यापुर्वी रु. १८,७६,१३,०००/- अनुदान वितरीत करण्यात आले असल्याने उर्वरित रु. २,०८,४६,४४०/- अनुदान नांदूरा नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक ०४.०३.२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या नांदूरा शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांकरीता एकूण अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु. २,०८,४६,४४०/- ( रुपये दोन कोटी आठ लक्ष शेहेचाळीस हजार चारशे चाळीस फक्त ) पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

( रक्कम रुपयांत )

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| नांदूरा नगर परिषद | २३,१६,२१,६०० | २०,८४,५९,४४० | २,३१,६२,१६० | २,३१,६२,१६० | १८,७६,१३,००० | २,०८,४६,४४० |
| | | | | | **एकुण रुपये** | **२,०८,४६,४४०** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१८१०१११७०३२१४५२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873e6409c70b0a0219d717dd6767c9aec9dd2d61ecf0cc982e9e93ef57312675, cn=Sunil Jairam Tumram
Date: 2018.10.12 11:40:10 +05'30'

**( सु.ज. तुमराम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
- जिल्हाधिकारी, बुलढाणा
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे.
- कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बुलढाणा
- जिल्हा प्रकल्प अधिकारी ( नगरपालिका ), जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा
- जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा
- मुख्याधिकारी, नांदूरा नगर परिषद, जि. बुलढाणा
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु-०५, पापु.२०,पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.